"एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत हातमाग विणकरांना केंद्र पुरस्कृत कच्चा माल पुरवठा योजनेतील (आरएमएसएस) धाग्यावर हातमाग विणकरांना अतिरीक्त अनुदान देणेबाबत - सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०२३/प्र.क्र.९४ (भाग-१)/टेक्स-३**
नविन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**वाचा :**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दिनांक ०२.०६.२०२३. (परिच्छेद क्रमांक ७.४)
२) शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०२३/प्र.क्र.९४/टेक्स-३, दिनांक १०.११.२०२३
२) शासन शुध्दीपत्रक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०२३/प्र.क्र.९४/टेक्स-३, दिनांक २२.०२.२०२४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४

**प्रस्तावना :**

राज्याच्या वस्त्रोद्योगाच्या वाढीस चालना देण्यासाठी व वस्त्रोद्योगाला आवश्यक त्या उपाययोजनांना हातभार लावण्यासाठी महाराष्ट्र शासनाने संदर्भीय शासन निर्णयान्वये एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ जाहीर केलेले आहे. सदर धोरणाच्या अनुषंगाने राज्यातील हातमाग क्षेत्राचे बळकटीकरण करणे, हातमागावर उत्पादीत होणाऱ्या कापडाची किंमत जास्त होत असल्याने ती नियंत्रीत करणे, हातमागावर उत्पादीत होणाऱ्या वाणाला बाजारपेठेत चांगली मागणी प्राप्त होवून हातमाग व्यवसाय वाढावा यासाठी केंद्रशासनाच्या योजनेत राज्याचा हिस्सा देण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक १०.११.२०२३ रोजी निर्गमीत करण्यात आला असून सदर योजनेचे शासन शुध्दीपत्रक दिनांक २२.०२.२०२४ रोजी निर्गमीत करण्यात आले आहे.

सदर शासन निर्णय आणि शुध्दीपत्रकानुसार राज्यातील हातमाग विणकरांना केंद्र पुरस्कृत कच्चा माल पुरवठा योजनेतील (आरएमएसएस) धाग्यावर अतिरीक्त अनुदान देण्याकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत हातमाग विणकरांना केंद्र पुरस्कृत कच्चा माल पुरवठा योजनेतील (आरएमएसएस) धाग्यावर हातमाग विणकरांना अतिरीक्त अनुदान देणेबाबत या योजनेकरीता वित्त विभागाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर निधी रू. १२,३६,६०,०००/- (अक्षरी- रू. बारा कोटी

छत्तीस लाख साठ हजार फक्त ) पैकी रू.५५,६५,०००/- (अक्षरी-रू. पंचावन्न लाख पासष्ट हजार फक्त) इतका निधी उपलब्ध केला आहे.

सदर निधी उपलब्धतेनुसार "मागणी क्रमांक व्ही-२ , लेखाशिर्ष- २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था,(०३) (०२) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कच्चा माल पुरवठा योजनेतील (आरएमएसएस) राज्य घटक (कार्यक्रम) (२८५१ ७४७२),३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली रू.५५,६५,०००/- (अक्षरी-रू. पंचावन्न लाख पासष्ट हजार फक्त) इतका निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर निधीतून वितरीत करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजने अंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रू.५५,६५,०००/- (अक्षरी-रू. पंचावन्न लाख पासष्ट हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यासाठी सहायक संचालक (लेखा), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त(वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात येत आहे,त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

४. या योजनेच्या लेखाशिर्षाअंतर्गत डिसेंबर पुरवणी मागणीद्वारे रू.१२,३६,६०,०००/- (अक्षरी- रू. बारा कोटी छत्तीस लाख साठ हजार फक्त ) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. शासन परिपत्रक,वित्त विभाग, अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दिनांक ०४.०३.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत म्हणजेच रू.१२,३६,६०,०००/- (अक्षरी- रू. बारा कोटी छत्तीस लाख साठ हजार फक्त ) पैकी रू.५५,६५,०००/- (अक्षरी-रू. पंचावन्न लाख पासष्ट हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास उपलब्ध राहील.

५. या योजनेच्या लेखाशिर्षाअंतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

६. वैयक्तिक लाभार्थ्यांची देयके आहरित करताना लाभार्थ्यांची यादी निश्चित करून योग्य त्या तपशीलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येवू नयेत. शक्यतो अशा लाभार्थ्यांचे आधार क्रमांक सुध्दा नमूद करावे.

७. सदर योजनेअंतर्गत पात्र लाभार्थ्यांना लाभ DBT प्रणीलद्वारे लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावा. याकरिता आयुक्त वस्त्रोद्योग यांनी उचित कार्यवाही करावी.

८. सदर योजनेकरीता " मागणी क्रमांक व्ही-२ , लेखाशिर्ष- २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था,(०३) (०२) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कच्चा माल पुरवठा योजनेतील (आरएमएसएस) राज्य घटक कार्यक्रम (२८५१ ७४७२),३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात येणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

९. आयुक्त (वस्त्रोद्योग),वस्त्रोद्योग आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य ,नागपूर यांनी सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

१०. या योजनेचा निधी खर्च करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे.तसेच यासंबंधी शासनाच्या मार्गदर्शक सुचना व नियमांचे पालन कटाक्षाने करावे.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग/अनौ.संदर्भ क्रमांक १८१/२०२४/व्यय-२, दिनांक ०६.०३.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१३५७१९३२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.03.14 14:06:45 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२,
३. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह,विधी व न्याय) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
६. मा.विरोधी पक्षनेता,विधान परिषद/ विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२
८. सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. संचालक (रेशीम),रेशीम संचालनालय,नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१४. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१६. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१७. नियोजन विभाग (कार्यासन -१४३१), मंत्रालय, मुंबई.
१८. प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), मुंबई/नागपूर/छत्रपती संभाजीनगर/सोलापूर.
१९. निवड नस्ती ( टेक्स-३)